नवि - ३२ क्र.क्रं. १२३

असा. क्र. १३ रजिस्टर्ड नं. टीईसीएच/४७-३०३/एमबीआय/२००२



# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

मंगळवार, जानेवारी ८, २००२/पौष १८, शके १९२३

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.

अनुक्रमणिका



दिनांक ४ जानेवारी २००२ रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला, महाराष्ट्र राज्य विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**प्रतिमा उमरजी,**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

### सन २००२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ११.

(मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर " **महाराष्ट्र शासन राजपत्रात** " दिनांक ८ जानेवारी २००२ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम).

**मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांत आणखी सुधारणा करण्याकरिता अधिनियम.**

१८८८ चा मुंबई ३. १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २.

**ज्याअर्थी,** यात पुढे दिलेल्या प्रयोजनांकरिता, मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र

नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करणे इष्ट आहे ; **त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या एकावन्नाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :— १९६५ चा महा. ४०

संक्षिप्त नाव व प्रारंभ. १. (१) या अधिनियमास, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी (सुधारणा) अधिनियम, २००० असे म्हणावे.

(२) (अ) हे कलम आणि कलमे १० ते २२ व ३० ही कलमे दिनांक १ एप्रिल १९९९ पासून अंमलात आली असल्याचे मानण्यात येईल.

(ब) अधिनियमाच्या उर्वरित तरतुदी, राज्य शासन **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे नेमून देईल, त्या दिनांकाला अंमलात येतील.

प्रकरण एक

**मुंबई महानगरपालिका अधिनियमाची सुधारणा.**

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६ ची सुधारणा. २. मुंबई महानगरपालिका अधिनियम (यात यापुढे ज्याचा निर्देश " मुंबई महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) याचे कलम १६ मधील, पोट-कलम (१-अ) नंतर पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :— १८८८ चा मुंबई ३.

" (१ब) (अ) एखादी व्यक्ती अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती किंवा नागरिकांचा मागासवर्ग (यात यापुढे ज्याचा निर्देश " राखीव प्रवर्ग " असा करण्यात आला आहे) यांच्यासाठी राखून ठेवलेल्या जागेवर खोट्या दाव्याच्या किंवा ती व्यक्ती अशा राखीव प्रवर्गातील आहे असे घोषित करणाऱ्या जातीच्या खोट्या प्रमाणपत्राच्या आधारे, पालिका सदस्य म्हणून निवडून आली होती असा निर्णय देणारा आदेश यथास्थिति कलम-१८ किंवा ३३ या अन्वये संबंधित प्राधिकाऱ्याने दिलेला असल्यास अशी व्यक्ती पालिका सदस्य म्हणून असण्यास किंवा पालिका सदस्य म्हणून निवडून येण्यासाठी निवडणूक लढविण्यास, सहा वर्षांच्या कालावधीसाठी अनर्ह ठरेल.

(ब) संबंधित प्राधिकारी ज्या दिनांकाला असा आदेश संमत करील, त्या दिनांकापासून अनर्हतेचा असा कालावधी सुरु होईल.

(१क) (अ) पोट-कलम (१ब) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी पोट-कलम (१ब) मध्ये निर्देशिलेल्या राखीव जागेवर निवडून आलेला पालिका सदस्य, जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती किंवा राज्य शासनाने जाती प्रमाणपत्राच्या छाननीसाठी विनिर्दिष्ट केलेला एखादा अन्य सक्षम प्राधिकारी यांनी, अशा पालिका सदस्याचे जाती प्रमाणपत्र इतर कोणत्याही सक्षम प्राधिकाऱ्याने अशा सदस्याचे जाती प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करून ती व्यक्ती राखीव प्रवर्गाची आहे असा दावा करणाऱ्या अशा व्यक्तीच्या खोट्या दाव्यावर किंवा प्रतिज्ञापत्रावर आधारित असल्याच्या कारणास्तव, ते रद्द केल्याचा परिणाम म्हणून तो असा सदस्य म्हणून राहण्यास अनर्ह होईल ; आणि त्यानंतर उक्त समितीने किंवा सक्षम प्राधिकाऱ्याने असे प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करून ते रद्द केल्याच्या दिनांकास व त्या दिनांकापासून त्या सदस्याने आपले पद रिकामे केले असल्याचे मानण्यात येईल.

(ब) एखादी व्यक्ती पालिका सदस्य म्हणून असण्यास अनर्ह ठरल्यास आणि परिणामी असा पालिका सदस्य म्हणून असलेले त्याचे पद खंड (अ) अन्वये रिक्त झाल्यास राज्य शासन, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, अशा व्यक्तीस अशा आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीकरिता पालिका सदस्य म्हणून निवडून येण्यास किंवा पालिका सदस्य म्हणून असण्यास अनर्ह ठरविल.

१९६६ चा महा. ३७. (१ड) जर पालिका सदस्याने, स्वतः त्याच्या बायकोने/तिच्या नवऱ्याने किंवा त्याच्या अवलंबिताने या अधिनियमाच्या किंवा महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या किंवा उक्त अधिनियमांखाली करण्यात आलेल्या नियमांच्या किंवा उप-विधींच्या तरतुदींचा भंग करून, कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत संरचनात्मक बांधकाम केलेले असेल किंवा करीत असेल किंवा असे बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम करण्यास प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे जबाबदार असेल किंवा पालिका सदस्य या नात्याने मदत केलेली असेल किंवा कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम पाडून टाकत असताना त्यांचे शासकीय कर्तव्य पार पाडण्यात कोणत्याही सक्षम प्राधिकाऱ्यास लेखी पत्र देऊन किंवा प्रत्यक्ष जागेवर जाऊन अडथळा आणला असेल किंवा अडथळा आणण्याचा प्रयत्न केलेला असेल तर, असा पालिका-सदस्य पालिका-सदस्य म्हणून राहण्यास अनर्ह ठरेल. अशी अनर्हता, उक्त अधिनियमांच्या तरतुदींअन्वये संबंधित प्राधिकाऱ्याने, अशी संरचना बेकायदेशीर किंवा अनधिकृत असल्याचे घोषित केल्याच्या दिनांकापासून किंवा यथास्थिति, सक्षम प्राधिकाऱ्याविरुद्ध पालिका-सदस्याने हस्तक्षेप किंवा अडथळा केल्याच्या दिनांकापासून पालिका-सदस्य म्हणून त्याचा पदावधी शिल्लक असेपर्यंत असेल.''.

३. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३७ नंतर पुढील नवीन कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यात नवीन कलम ३७-एक-अ१ समाविष्ट करणे.

'' **३७-एक-अ१.** (१) जो निर्वाचित पालिका सदस्य मोठे संख्याबळ असलेल्या पक्षाचा त्यावेळी नेता असेल, आणि महापौराकडून ज्याला तशी मान्यता मिळाली असेल, तो सभागृहाचा नेता असेल. सभागृहाचा नेता.

**स्पष्टीकरण.**—जेव्हा एक समान संख्याबळ असलेले दोन सत्ताधारी पक्ष असतील तेव्हा महापौर, पक्षाचा दर्जा लक्षात घेऊन अशा पक्षामधून कोणत्याही एका पक्षातील नेत्याला सभागृहाचा नेता म्हणून मान्यता देईल.

(२) सभागृहाच्या नेत्याला मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्याबाबत महानगरपालिकेने केलेल्या विनियमांद्वारे तरतूद केल्यानुसार मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्यात येतील.''.

४. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६१ मधील खंड (म) मधील '' त्यात सुधारणा करणे,'' या मजकुरानंतर पुढील मजकूर जादा दाखल करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ६१ ची सुधारणा

'' आणि तसेच, रस्त्यांवरील वाहनांचे मार्ग व पादचारी रहदारी सुरक्षित व सुव्यवस्थित ठेवण्यासाठी इतर उपाययोजना करणे.''.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ६९ ची सुधारणा.

५. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६९, मध्ये, खंड (क) ऐवजी पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

" (क) आयुक्तांकडून कोणतीही स्थावर मालमत्ता किंवा तिच्यातील कोणताही हितसंबंध यांच्याशी संबंधित संविदेखेरीज, जीमध्ये दहा लाख रुपयांहून अधिक परंतु पंधरा लाख रुपयांहून अधिक नाही अशा खर्चाचा अंतर्भाव असेल, अशी कोणतीही संविदा महापौराने तिला मंजुरी दिल्याशिवाय करण्यात येणार नाही. पंधरा लाख रुपयांहून अधिक खर्चाचा अंतर्भाव असलेल्या संविदांना स्थायी समितीच्या मंजुरीची आवश्यकता असेल :

परंतु, महापौराने मंजुरी दिलेल्या सर्व रकमांची एकूण बेरीज वर्षात रुपये एक कोटींहून अधिक होणार नाही :

परंतु आणखी असे की, स्थायी समिती, आयुक्ताने तयार केलेल्या प्रस्तावांवर ते मिळाल्यापासून तीस दिवसांच्या आत विचार करील आणि ते निकालात काढील. स्थायी समितीने असे करण्यात कसूर केल्यास अशा संविदेस स्थायी समितीने पूर्वमंजुरी दिली असल्याचे मानण्यात येईल आणि आयुक्त तशा अर्थाचा अहवाल महानगरपालिकेस देईल . ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्र. ३ यात नवीन कलम ७२-अ समाविष्ट करणे.

६. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७२ नंतर पुढील नवीन कलम समाविष्ट करण्यात येईल :—

बेरोजगार अभियंत्याबरोबर संविदा करण्याचा अधिकार.

" **७२-अ.** या अधिनियमात काहीही अंतर्भूत असले तरी, परंतु राज्य शासन सर्वसाधारण किंवा विशेष आदेशांद्वारे निर्धारित करील अशा अटी व शर्तीस अधीन राहून, आयुक्त, जीमध्ये पाच लाख रुपयांहून अधिक खर्चाचा अंतर्भाव नसेल असे बांधकाम करण्यासाठी बेरोजगार अभियंत्यांबरोबर कोणतीही संविदा करील :

परंतु, राज्य शासनाने निर्धारित केलेल्या अटी व शर्तीमध्ये अर्हता, अनुभव व बेरोजगार अभियंत्याची नोंदणी करण्यासाठीची तरतूद या शर्तीचा देखील समावेश असेल :

परंतु आणखी असे की, अशा संविदांची अंमलबजावणी करण्यासाठी महानगरपालिका, राज्य शासनाने निर्धारित केलेल्या अटी व शर्ती यांच्याशी विसंगत नसतील अशा अटी व शर्ती देखील विनिर्दिष्ट करील.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ७८-क ची सुधारणा.

७. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७८-क मध्ये, " महानगरपालिका मुख्य लेखापालाची " या मजकुरानंतर " (वित्त) " हा मजकूर दाखल करण्यात येईल आणि समास टीपेत " महानगरपालिका मुख्य लेखापालाची " या मजकुराऐवजी " महानगरपालिका मुख्य लेखापाल (वित्त) याची " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ७८-ड ची सुधारणा.

८. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७८-ड मध्ये, समास टीपेसह " महानगरपालिका अपर मुख्य लेखापालाची " हा मजकूर जेथे जेथे आला असेल तेथे " महानगरपालिका मुख्य लेखापाल (पाणीपुरवठा व मलनिस्सारण)" हा मजकूर त्याच्या व्याकरणिक फेरफारांसह दाखल करण्यात येईल.

९. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७८-ई मध्ये, समासटिपेसह " महानगरपालिका सह मुख्य लेखापाल " हा मजकूर, जेथे जेथे आला असेल तेथे " महानगरपालिका मुख्य लेखापाल (कोषागार) " हा मजकूर त्याच्या व्याकरणिक फेरफारांसह दाखल करण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ७८-ई ची सुधारणा.

१०. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३९ मधील,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १३९ ची सुधारणा.

(अ) नोंद क्रमांक (२) मध्ये, " वाहने व जनावरे यांवरील " या मजकुराऐवजी " कुत्र्यांवरील " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(ब) परंतुक वगळण्यात येईल.

११. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १८० याचे पूर्वी येणारे शीर्षक वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १८० याचे पूर्वी येणारे शीर्षक वगळणे.

१२. मुंबई महानगरपालिका अधिनियमाची कलमे १८०, १८१,१८२, १८५, १८६, १८७,१८८, १८९, १९० आणि १९१ वगळण्यात येतील. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याची कलमे १८०, १८१, १८२, १८५, १८६, १८७, १८८, १८९, १९० आणि १९१ वगळणे.

१३. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १९१-अ च्या पूर्वी येणाऱ्या " कुत्रे " या शीर्षकाऐवजी " कुत्र्यांवरील कर " हे शीर्षक दाखल करण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १९१-अ च्या पूर्वी येणाऱ्या शीर्षकाची सुधारणा.

१४. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १९१-ड मधील, " कलमे १८० ते १८२, १८५ ते १८८, १८९, १९०, १९१, १९८ " हा मजकूर वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १९१-ड ची सुधारणा.

१५. मुंबई महानगरपालिका अधिनियमाचे कलम १९८ वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याचे कलम १९८ वगळणे.

१६. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २०० मधील,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०० ची सुधारणा.

(अ) पोट-कलम (१) मध्ये,—

(एक) " किंवा कलम १९८, पोट-कलमे (२) व (३) यात निर्देशिलेल्या वाहनांहून व जनावरांहून अन्य वाहनांवरील व जनावरांवरील कोणताही कर येणे होईल " हा मजकूर वगळण्यात येईल;

(दोन) " कोणताही " हा मजकूर वगळण्यात येईल;

(ब) पोट-कलम (२) मध्ये,--

(एक) " वाहनांच्या किंवा जनावरांच्या " या मजकुराऐवजी " कुत्र्यांच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(दोन) " वाहनांवरील व जनावरांवरील कर भरण्याबद्दल असलेल्या अशा प्रत्येक बिलांवर कलमें १८८ ते १९१ याच्या तरतुदी मुद्रित केलेल्या असतील " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०३ ची सुधारणा.

**१७.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २०३ मधील, पोट-कलम (१) मध्ये " किंवा कर कोणत्याही वाहनाच्या किंवा जनावरांच्या संबंधात देय असेल तर असे वाहन किंवा जनावर " हा मजकूर " आणि अटकावून ठेऊन व विकून " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०४ ची सुधारणा.

**१८.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २०४ मध्ये, " किंवा ज्यांच्या संबंधात कर येणे असेल अशी वाहने किंवा जनावरे " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०५ ची सुधारणा.

**१९.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २०५ मध्ये, " आणि वाहने किंवा जनावरे " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २०८-अ वगळणे.

**२०.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाचे कलम २०८-अ वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २१० ची सुधारणा.

**२१.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाचे कलम २१० मधील पोट-कलम (१) मध्ये, " किंवा वाहनांवरील व जनावरांवरील कर " हा मजकूर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम २११ ची सुधारणा.

**२२.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २११ मध्ये, " किंवा वाहने आणि जनावरे यांवरील करापोटी " हा मजकूर वगळण्यात येईल.

**२३.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३१४ मधील, खंड (क) नंतर, पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३१४ ची सुधारणा

" (ड) कोणत्याही व्यक्तीने, कोणत्याही सार्वजनिक जमिनीचा अनधिकृत रीत्या भोगवटा केला असेल किंवा तिने दोषपूर्ण रीतीने जमिनीचा ताबा मिळविला असेल, अशा जमिनीवर अशा व्यक्तीने अनधिकृतपणे ठेवलेल्या, प्रक्षेपित केलेल्या किंवा जमा केलेल्या सर्व वस्तू व साहित्य याचबरोबर त्या व्यक्तीस अशा जमिनीवरून काढून टाकण्याची तजवीज करता येईल :

परंतु, आयुक्त, अशा प्रकारे काढून टाकण्याची अंमलबजावणी करतेवेळी, अशा व्यक्तींस तिच्या व्यक्तीगत चीजवस्तू, स्वयंपाकाची भांडीकुंडी, कुटुंबियांचे अंथरूण-पांघरूण इत्यादींसारख्या आणि घरगुती वापराच्या वस्तू घेऊन जाण्यास अनुमती देईल.".

**२४.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३२६-अ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम ३२६-ब समाविष्ट करणे

" **३२६-ब.** (१) आयुक्त, वेळोवेळी पोलीस आयुक्तांशी विचारविनिमय करून, क्षेत्र अनुज्ञापन, परिवेश (कॉर्डन) दर निश्चिती, पूरक अनुज्ञापन, सर्व वाहनांच्या प्रवेशासाठी सडकेवरील आणि सडकेच्या बाजूस वाहने उभी करून ठेवणे, इत्यादींसाठी (शुल्क) आकारणे यांसारख्या मार्ग दरनिश्चिती पद्धतींसह कोणत्याही " वाहतुकीच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या उपाययोजना " सुरू करण्यासाठी असलेले क्षेत्र म्हणून अधिसूचित करण्यासाठी कोणतेही क्षेत्र विनिर्दिष्ट करू शकेल. वाहतुकीच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या उपाययोजना सुरू करण्याचा आयुक्ताचा अधिकार.

**स्पष्टीकरण.**—या पोट-कलमाच्या प्रयोजनार्थ,—

(एक) " परिवेश (कॉर्डन) दरनिश्चिती " म्हणजे, नामनिर्दिष्ट क्षेत्रामधील प्रवेशाच्या सर्व ठिकाणी मार्ग पार करून जाणाऱ्या वाहनांकडून देय असलेले आकार ;

(दोन) " पूरक अनुज्ञापन " म्हणजे, विनिर्दिष्ट वेळेत वाहनांचा वापर करण्याकरिता शहराच्या विवक्षित क्षेत्रांमध्ये आकारण्यात येणारी लायसन फी.

(२) आयुक्त, महानगरपालिकेकडून निर्धारित करण्यात येतील अशा अटी व शर्तींना अधीन राहून, कोणत्याही व्यक्तीकडून किंवा संघटनेकडून किंवा यथास्थिति संस्थेकडून दर दिवसासाठी किंवा त्याच्या भागासाठी अशा क्षेत्रांच्या वापराकरिता अशी फी किंवा आकार आकारू शकेल. ".

**२५.** मुंबई महानगरपालिका अधिनियम याच्या कलम ३५१ मधील,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३५१ ची सुधारणा.

(अ) पोट-कलम (२), " उक्त व्यक्ती देईल. " या मजकुरानंतर पुढील मजकूर जादा दाखल करण्यात येईल :—

" आयुक्ताने, इमारत किंवा बांधकाम काढून टाकल्यास किंवा पाडून टाकल्यास, तो अशा इमारतीचा किंवा बांधकामाचा ढिगारा त्याचबरोबर बांधकामाच्या जागी अशा व्यक्तीच्या मालकीची कोणतीही असल्यास इतर बांधकाम सामग्री विहित रीतीने जप्त करील व त्याची विल्हेवाट लावील आणि अशा विक्रीपासून किंवा विल्हेवाटीपासून प्राप्त होणाऱ्या रकमेतून असे ढिगारे व सामग्री काढून टाकण्यासाठी व विक्री करण्यासाठी आलेला खर्च वजा करून प्राप्त रकमेतील शिल्लक रक्कम आयुक्त संबंधित व्यक्तीस, परत करील. ";

(ब) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :–

"(३) कोणतेही न्यायालय, राज्य शासनाच्या किंवा महानगरपालिकेच्या किंवा कोणत्याही अन्य स्थानिक प्राधिकरणाच्या मालकीच्या कोणत्याही जमिनीतून किंवा मालमत्तेतून कोणत्याही सार्वजनिक प्रकल्पासाठी किंवा नागरी सुविधांसाठी आवश्यक असलेल्या कोणत्याही जमिनीतून निष्कासित करण्याच्या, ती पाडून टाकण्याच्या किंवा काढून टाकण्याच्या नोटिशीसह कोणत्याही जाहीर नोटिशीच्या कार्यवाहीला, आयुक्तास, त्याची बाजू मांडण्याची वाजवी संधी दिल्याशिवाय स्थगिती देणार नाही.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ४६१ ची सुधारणा.

**२६.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४६१ मधील खंड (यय) नंतर पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

"(ययअ) "साधनसामग्री यंत्रणे" ची मांडणी व परिरक्षा यांच्यासह वाहतूक यंत्रणा आणि वाहतूक मागणी उपाययोजना यांच्यांशी संबंधित सर्व बाबींचे विनियमन.

**स्पष्टीकरण.**—–या खंडाच्या प्रयोजनासाठी "साधनसामग्री यंत्रणा" याचा अर्थ वाहतुकीचे संकेत आणि माहिती संचार जाळे नियंत्रक केंद्रीय संनियंत्रण सामग्री यांसारखी संबद्ध साधनसामग्री आणि वाहतुकीचे नियंत्रण व अंमलबजावणी यासाठी आवश्यक असलेली इतर सर्व सामग्री ;".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ४७१ ची सुधारणा.

**२७.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४७१ मधील तक्त्यातील कलमे १८८ व ३५४ यांच्याशी संबंधित नोंदी वगळण्यात येतील.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ४७२ ची सुधारणा.

**२८.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४७२ मधील, कलम ३५४ शी संबंधित असलेली नोंद वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ४७५-अ ची सुधारणा.

**२९.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४७५-अ मधील, "कलम ३५१" या मजकुराऐवजी "कलम ३५१ आणि ३५४" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ सोबत जोडलेली अनुसूची "ग" वगळणे.

**३०.** मुंबई महानगरपालिका अधिनियमास जोडलेली अनुसूची "ग" वगळण्यात येईल.

**३१.** मुंबई महानगरपालिका अधिनियमास जोडलेल्या अनुसूची "आय" मधील, "वाहनांबद्दल किंवा जनावरांबद्दल किंवा" हा मजकूर वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ सोबत जोडलेल्या अनुसूची "आय" ची सुधारणा.

२००२ चा महा. ११ **३२.** (१) मुंबई महानगरपालिका व नगरपरिषदा, नगर पंचायती आणि औद्योगिक नगरी (सुधारणा) अधिनियम, २००० याद्वारे, वाहनांवरील कर रद्द झाला असला तरीही आणि मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या अशा करासंबंधीच्या तरतुदी वगळण्यात आल्या तरीही त्याखाली करण्यात आलेले, आणि उक्त सुधारणा अधिनियम अंमलात येण्याच्या लगतपूर्वी अंमलात असलेले सर्व नियम व विनियम आणि त्याखाली काढण्यात आलेले आदेश, अधिसूचना किंवा नोटिसा, कर बसविणे, त्याची आकारणी, वसुली व परतावा, कोणतीही शास्ती लादणे यांच्या प्रयोजनासाठी किंवा उक्त सुधारणा अधिनियमाच्या प्रारंभापूर्वी नोंदणी करण्यात आलेल्या वाहनांच्या बाबतीत कर बसविणे, त्याची आकारणी, वसुली, परतावा किंवा शास्ती यांच्या प्रयोजनांसाठी किंवा उपरोक्तांपैकी कोणत्याही प्रकारच्या, कोणत्याही प्रयोजनांशी संबंधित किंवा त्यास आनुषंगिक असलेल्या कोणत्याही अन्य प्रयोजनांसाठी अंमलात असण्याचे चालू राहील आणि त्यांच्याशी संबंधित असलेली कार्यवाही उक्त सुधारणा अधिनियम अधिनियमित करण्यात आला नव्हता असे समजून, न्यायालयांकडून किंवा प्राधिकाऱ्यांकडून चालू ठेवण्यात येतील आणि निकालात काढण्यात येईल. व्यावृत्ती.

(२) उक्त सुधारणा अधिनियमाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या तरतुदींची प्रयोजने पार पाडण्यासाठी नियुक्त करण्यात आलेले किंवा अधिसूचित करण्यात आलेले किंवा अधिकार प्रदान करण्यात आलेले अधिकारी किंवा प्राधिकारी हे, पोट-कलम (१) च्या प्रयोजनाकरिता सक्षम अधिकारी किंवा प्राधिकारी असल्याचे चालू राहील.

प्रकरण दोन

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ यातील सुधारणा.**

१९४९ चा मुंबई ५९. **३३.** मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (यात यापुढे ज्याचा निर्देश "प्रांतिक महानगरपालिका अधिनियम" असा करण्यात आला आहे) याच्या कलम ५ मधील, पोट-कलम (३) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ५ ची सुधारणा.

"(४) पोट-कलम (३) मध्ये किंवा या अधिनियमाच्या इतर कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, सार्वत्रिक निवडणुकांनंतर, एखाद्या शहराच्या क्षेत्राचा विस्तार करण्यात आल्यास विस्तारित क्षेत्राच्या लोकांचे प्रतिनिधित्व करण्यासाठी, जमेल तितक्या लवकर, निवडणूक घेण्यात येईल आणि पोट-कलम (३) च्या तरतुदीं योग्य त्या फेरफारांसह अशा निवडणुकांना लागू होतील :

परंतु, या पोट-कलमान्वये केलेल्या विस्तारित क्षेत्रासाठी नव्याने रचना केलेल्या प्रभागांसह नगरपालिका क्षेत्रातील एकूण प्रभागांची संख्या ही, पोट-कलम (२), खंड (अ) मधील तक्त्यात विनिर्दिष्ट केलेल्या निवडणूक प्रभागांपेक्षा अधिक असणार नाही :

परंतु आणखी असे की, या पोट-कलमान्वये नव्याने रचना करण्यात आलेल्या प्रभागाची लोकसंख्या इतर प्रभागांच्या सरासरी लोकसंख्येपेक्ष अंशतः अधिक किंवा कमी होऊ शकेल :

परंतु तसेच, या पोट-कलमान्वये नव्याने रचना करण्यात आलेल्या प्रभागांतून निवडून आलेल्या पालिका सदस्यांचा पदावधी महानगरपालिकेच्या कालावधी एवढाच असेल.

(५) महानगरपालिकेचा उर्वरित अवधी जर एक वर्षापेक्षा कमी असेल तर, पोट-कलम (४) अन्वये निवडणूक घेता येणार नाही. ''.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ५अ ची सुधारणा.

**३४.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५अ मधील खंड (ड) नंतर पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :—

''(ई) खंड (अ) ते खंड (ड) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य निवडणूक आयुक्त, काही कारणांमुळे सार्वत्रिक निवडणुकीनंतर प्रभागांच्या संख्येत बदल झाला आहे अशा महानगरपालिकेमध्ये अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, नागरिकांचा मागासवर्ग व महिला यांच्यासाठी आळीपाळीने राखीव प्रभाग निश्चित करण्याविषयीच्या सूचना आदेशाद्वारे काढील. ''.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १० ची सुधारणा.

**३५.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याच्या कलम १० मधील, पोट-कलम (१अ) नंतर, पुढील पोट-कलमे दाखल करण्यात येतील.

''(१ब) (अ) एखादी व्यक्ती अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती किंवा नागरिकांचा मागासवर्ग (यात यापुढे ज्याचा निर्देश '' राखीव प्रवर्ग '' असा करण्यात आला आहे.) यांच्यासाठी राखून ठेवलेल्या जागेवर खोट्या दाव्याच्या किंवा ती व्यक्ती अशा राखीव प्रवर्गातील आहे असे घोषित करणाऱ्या जातीच्या खोट्या प्रमाणपत्राच्या आधारे, पालिका सदस्य म्हणून निवडून आली होती असा निर्णय देणारा आदेश यथास्थिति कलम १२ किंवा १६ या अन्वये संबंधित प्राधिकाऱ्याने दिलेला असल्यास अशी व्यक्ती पालिका सदस्य म्हणून असण्यास किंवा पालिका सदस्य म्हणून निवडून येण्यासाठी निवडणूक लढविण्यास, सहा वर्षांच्या कालावधीसाठी अनर्ह ठरील.

(ब) संबंधित प्राधिकारी ज्या दिनांकाला असा आदेश संमत करील, त्या दिनांकापासून अनर्हतेचा असा कालावधी सुरू होईल.

(१क) (अ) पोट-कलम (१ब) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, पोट-कलम (१ब) मध्ये निर्देशिलेल्या राखीव जागेवर निवडून आलेला पालिका सदस्य जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती किंवा राज्य शासनाने जाती प्रमाणपत्राच्या छाननीसाठी विनिर्दिष्ट केलेला एखादा अन्य सक्षम प्राधिकारी यांनी, अशा पालिका सदस्याचे जाती प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करुन ती व्यक्ती राखीव प्रवर्गाची आहे असा दावा करणाऱ्या अशा व्यक्तीच्या खोट्या दाव्यावर किंवा प्रतिज्ञापत्रावर आधारित असल्याच्या कारणास्तव ते रद्द केल्याचा परिणाम म्हणून तो असा सदस्य म्हणून राहण्यास अनर्ह होईल ; आणि त्यानंतर उक्त समितीने किंवा सक्षम प्राधिकाऱ्याने असे प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करून ते रद्द केल्याच्या दिनांकास व त्या दिनांकापासून त्या सदस्याने आपले पद रिकामे केले असल्याचे मानण्यात येईल.

(ब) एखादी व्यक्ती पालिका सदस्य म्हणून असण्यास अनर्ह ठरल्यास आणि परिणामी असा पालिका सदस्य म्हणून असलेले त्याचे पद, खंड (अ) अन्वये, रिक्त झाल्यास राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे अशा व्यक्तीस अशा आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीकरिता पालिका सदस्य म्हणून निवडून येण्यास किंवा पालिका सदस्य म्हणून असण्यास, अनर्ह ठरवील.

१९६६ चा महा. ३७. (१ड) जर पालिका सदस्याने, स्वतः त्याच्या बायकोने/तिच्या नवऱ्याने किंवा त्याच्या अवलंबिताने या अधिनियमाच्या किंवा महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या किंवा उक्त अधिनियमांखाली करण्यात आलेल्या नियमांच्या किंवा उपविधींच्या तरतुदींचा भंग करून, कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत संरचनात्मक बांधकाम केले असेल किंवा करीत असेल; किंवा असे बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम करण्यास प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे जबाबदार असेल किंवा पालिका सदस्य या नात्याने मदत केलेली असेल किंवा कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम पाडून टाकत असताना त्याचे शासकीय कर्तव्य पार पाडण्यात कोणत्याही सक्षम प्राधिकाऱ्यास लेखी पत्र देऊन किंवा प्रत्यक्ष जागेवर जाऊन अडथळा आणला असेल किंवा अडथळा आणण्याचा प्रयत्न केला असेल तर, असा पालिका सदस्य पालिका सदस्य म्हणून राहण्यास अनर्ह ठरेल. अशी अनर्हता, उक्त अधिनियमाच्या तरतुदीअन्वये, संबंधित प्राधिकाऱ्याने, अशी संरचना बेकायदेशीर, किंवा अनधिकृत असल्याचे घोषित केल्याच्या दिनांकापासून किंवा यथास्थिति, सक्षम प्राधिकाऱ्याविरूद्ध पालिका सदस्याने हस्तक्षेप किंवा अडथळा केल्याच्या दिनांकापासून पालिका सदस्य म्हणून त्याचा पदावधी शिल्लक असेपर्यंत असेल.''.

**३६.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १९ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये १९-एक अ आणि १९-एक अअ ही नवीन कलमे समाविष्ट करणे.

सभागृहाचा नेता. " **१९-एक-अ** (१) जो निर्वाचित पालिका सदस्य मोठे संख्याबळ असलेल्या पक्षाचा त्यावेळी नेता असेल, आणि महापौराकडून ज्याला तशी मान्यता मिळाली असेल, तो सभागृहाचा नेता असेल.

**स्पष्टीकरण.**—जेव्हा एकसमान संख्याबळ असलेले दोन सत्ताधारी पक्ष असतील तेव्हा महापौर, पक्षाचा दर्जा लक्षात घेऊन अशा पक्षामधून कोणत्याही एका पक्षातील नेत्याला सभागृहाचा नेता म्हणून मान्यता देईल.

(२) सभागृहाच्या नेत्याला, मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्याबाबत महानगरपालिकेने केलेल्या विनियमांद्वारे तरतूद केल्यानुसार मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्यात येतील.

विरोधी पक्ष नेता. **१९-एक-अअ** (१) जो निर्वाचित पालिका सदस्य मोठे संख्याबळ असलेल्या विरोधी पक्षाचा त्यावेळी नेता असेल, आणि महापौराकडून ज्याला तशी मान्यता मिळाली असेल, तो विरोधी पक्ष नेता असेल.

**स्पष्टीकरण.**—जेव्हा एकसमान संख्याबळ असलेले दोन किंवा अधिक विरोधी पक्ष असतील तेव्हा महापौर, पक्षाचा दर्जा लक्षात घेऊन अशा पक्षामधून कोणत्याही एका पक्षातील नेत्याला विरोधी पक्ष नेता म्हणून मान्यता देईल.

(२) विरोधी पक्ष नेत्याला, मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्याबाबत महानगरपालिकेने केलेल्या विनियमांद्वारे तरतूद केल्यानुसार मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्यात येतील.".

प्रकरण तीन

## नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ याची सुधारणा.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५ ची सुधारणा.

**३७.** नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (यात यापुढे ज्याचा निर्देश " नागपूर महानगरपालिका अधिनियम " असा केला आहे), याच्या कलम १५ ला त्याचे पोट-कलम (१) असा नव्याने क्रमांक देण्यात येईल आणि अशा प्रकारे नव्याने क्रमांक देण्यात आलेल्या पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलमे जादा दाखल करण्यात येतील :— १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २

" (२) (अ) एखादी व्यक्ती अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती किंवा नागरिकांचा मागासवर्ग (यात यापुढे ज्याचा निर्देश " राखीव प्रवर्ग " असा करण्यात आला आहे) यांच्यासाठी राखून ठेवलेल्या जागेवर खोट्या दाव्याच्या किंवा ती व्यक्ती अशा राखीव प्रवर्गातील आहे असे घोषित करणाऱ्या जातीच्या खोट्या प्रमाणपत्राच्या आधारे, पालिका सदस्य म्हणून निवडून आली होती असा निर्णय देणारा आदेश, यथास्थिति, कलम-१९अ, २१(२) किंवा ४२८ या अन्वये संबंधित प्राधिकाऱ्याने दिलेला असल्यास अशी व्यक्ती पालिका सदस्य म्हणून असण्यास किंवा पालिका सदस्य म्हणून निवडून येण्यासाठी निवडणूक लढविण्यास, सहा वर्षांच्या कालावधीसाठी अनर्ह ठरील.

(ब) संबंधित प्राधिकारी ज्या दिनांकाला असा आदेश संमत करील, त्या दिनांकापासून अनर्हतेचा असा कालावधी सुरू होईल.

(३) (अ) पोट-कलम (२) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, पोट-कलम (२) मध्ये निर्देशिलेल्या राखीव जागेवर निवडून आलेला पालिका सदस्य, जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती किंवा राज्य शासनाने जाती प्रमाणपत्राच्या छाननीसाठी विनिर्दिष्ट केलेला एखादा अन्य सक्षम प्राधिकारी यांनी, अशा पालिका सदस्याचे जाती प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करून ती व्यक्ती राखीव प्रवर्गाची आहे असा दावा करणाऱ्या अशा व्यक्तीच्या खोट्या दाव्यावर किंवा प्रतिज्ञापत्रावर आधारित असल्याच्या कारणास्तव ते रद्द केल्याचा परिणाम म्हणून तो असा सदस्य म्हणून राहण्यास अनर्ह होईल ; आणि त्यानंतर उक्त समितीने किंवा सक्षम प्राधिकाऱ्याने असे प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करून ते रद्द केल्याच्या दिनांकास व त्या दिनांकापासून त्या सदस्याने आपले पद रिकामे केले असल्याचे मानण्यात येईल.

(ब) एखादी व्यक्ती पालिका सदस्य म्हणून असण्यास अनर्ह ठरल्यास आणि परिणामी असा पालिका सदस्य म्हणून असलेले त्याचे पद, खंड (अ) अन्वये रिक्त झाल्यास राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे, अशा व्यक्तीस, अशा आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीकरिता पालिका सदस्य म्हणून निवडून येण्यास किंवा पालिका सदस्य म्हणून असण्यास, अनर्ह ठरवील. ".

**३८.** नागपूर महानगरपालिका अधिनियम, याच्या कलम १९ मधील,— सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १९ ची सुधारणा.

(अ) खंड (इ) मधील, " आयुक्त " या मजकुराऐवजी " आयुक्त, किंवा " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ब) खंड (इ) नंतर, पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :—

१९६६ चा महा. ३७. " (फ) या अधिनियमाच्या किंवा महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या किंवा उक्त अधिनियमांखालील करण्यात आलेल्या नियमांच्या किंवा उपविधींच्या तरतुदींचा भंग करून स्वतः त्याच्या बायकोने/तिच्या नवऱ्याने किंवा त्याच्या अवलंबिताने कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत संरचनात्मक बांधकाम केलेले असेल किंवा करीत असेल ; किंवा असे बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम करण्यास प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे जबाबदार असेल किंवा पालिका-सदस्य या नात्याने मदत केलेली असेल किंवा कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम पाडून टाकत असताना त्याचे शासकीय कर्तव्य पार पाडण्यात कोणत्याही सक्षम प्राधिकाऱ्यास लेखी प्रत देऊन किंवा प्रत्यक्ष जागेवर जाऊन अडथळा आणला असेल किंवा अडथळा आणण्याचा प्रयत्न केलेला असेल तर असा पालिका-सदस्य पालिका-सदस्य म्हणून राहण्यास अनर्ह ठरेल. अशी अनर्हता, उक्त अधिनियमाच्या तरतुदीअन्वये संबंधित प्राधिकाऱ्याने अशी संरचना बेकायदेशीर किंवा अनधिकृत असल्याचे घोषित केल्याच्या दिनांकापासून किंवा यथास्थिति, सक्षम प्राधिकाऱ्याविरुद्ध पालिका-सदस्यांने हस्तक्षेप किंवा अडथळा केल्याच्या दिनांकापासून पालिकासदस्य म्हणून त्याचा पदावधी शिल्लक असेपर्यंत असेल.".

**३९.** नागपूर महानगरपालिका अधिनियम याच्या कलम २०-१ ई नंतर पुढील कलम जादा दाखल करण्यात येईल :— सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यात २१-१फ हे नवीन कलम समाविष्ट करणे.

" **२०-१ फ** (१) जो निर्वाचित पालिका-सदस्य मोठे संख्याबळ असलेल्या पक्षाचा त्यावेळी नेता असेल, आणि महापौराकडून ज्याला तशी मान्यता मिळाली असेल, तो सभागृहाचा नेता असेल. सभागृहाचा नेता.

**स्पष्टीकरण.**—जेव्हा एकसमान संख्याबळ असलेले दोन सत्ताधारी पक्ष असतील तेव्हा महापौर, पक्षाचा दर्जा लक्षात घेऊन अशा पक्षांमधून कोणत्याही एका पक्षातील नेत्याला सभागृहाचा नेता म्हणून मान्यता देईल.

(२) सभागृहाच्या नेत्याला मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्याबाबत महानगरपालिकेने केलेला विनियमांद्वारे तरतूद केल्यानुसार मानधन, भत्ते व इतर सुविधा देण्यात येतील.".

**४०.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६३ मधील, खंड (क) मध्ये,— सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ६३ ची सुधारणा.

(अ) " वीस लाख रुपयांहून अधिक नाही अशा खर्चाचा अंतर्भाव असेल अशी कोणतीही संविदा, महापौराच्या मान्यतेशिवाय करता येणार नाही " या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" पंधरा लाख रुपयांहून अधिक नाही अशा खर्चाचा अंतर्भाव असेल अशी कोणतीही संविदा, महापौराच्या मान्यतेशिवाय करता येणार नाही. तथापि, महापौराने एका वर्षात मान्यता दिलेल्या संविदांची एकूण रक्कम एक कोटी रुपयांहून अधिक असणार नाही. ";

(ब) " वीस लाख रुपयांपेक्षा अधिक " या मजकुराऐवजी " पंधरा लाख रुपयांपेक्षा अधिक " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ च्या कलम ८६ ची सुधारणा.

**४१.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ८६ मधील,—

(एक) पोट-कलम (१) मध्ये, " १० जानेवारी रोजी " या मजकुराऐवजी " ५ फेब्रुवारी रोजी " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

(दोन) पोट-कलम (३) मध्ये,—

(अ) " दहा जानेवारी " या मजकुराऐवजी " ५ फेब्रुवारी " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ब) " पंधरा फेब्रुवारी " या मजकुराऐवजी " २८ फेब्रुवारी " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

## प्रकरण चार

## महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ याची सुधारणा

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १० ची सुधारणा.

**४२.** महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (यात यापुढे ज्याचा निर्देश " नगरपरिषदा अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम १०, पोट-कलम (४) नंतर पुढील पोट-कलमे जादा दाखल करण्यात येतील :— १९६५ चा महा. ४०

" (५) या अधिनियमाची पोट-कलमे (१) व (३) मध्ये किंवा या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, सार्वत्रिक निवडणुकीनंतर, कलम ६, पोट-कलम (१), खंड (अ) अन्वये एखाद्या नगरपालिका क्षेत्राचा विस्तार करण्यात आल्यास, विस्तारित क्षेत्राच्या लोकांचे प्रतिनिधित्व करण्यासाठी व्यवहार्य असेल तितक्या लवकर, निवडणूक घेण्यात येईल आणि पोट-कलम (१) च्या तरतुदी, योग्य त्या फेरफारांसह या निवडणुकांना लागू होतील :

परंतु, या पोट-कलमान्वये विस्तारित क्षेत्रासाठी नव्याने रचना केलेल्या प्रभागांसह नगरपालिका क्षेत्रातील एकूण प्रभागांची संख्या ही, कलम ९, पोट-कलम (२), खंड (अ) मधील तक्त्यात विनिर्दिष्ट केलेल्या निवडणूक प्रभागापेक्षा अधिक असणार नाही :

परंतु आणखी असे की, या पोट-कलमान्वये नव्याने रचना करण्यात आलेल्या प्रभागांची लोकसंख्या इतर प्रभागांच्या सरासरी लोकसंख्येपेक्षा अंशतः अधिक किंवा कमी होऊ शकेल :

29

परंतु तसेच, या पोट-कलमान्वये नव्याने रचना करण्यात आलेल्या प्रभागांतून निवडून आलेल्या पालिका-सदस्यांचा पदावधी नगरपरिषदेच्या कालावधी एवढाच असेल.

(६) नगरपरिषदेचा उर्वरित अवधी जर एक वर्षापेक्षा कमी असेल तर, पोट-कलम (५) अन्वये निवडणूक घेता येणार नाही. ".

४३. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १६ मध्ये पोट-कलम (१अ) नंतर पुढील पोट-कलमे समाविष्ट करण्यात येतील :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १६ ची सुधारणा.

" (१ब) (अ) एखादी व्यक्ती अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती किंवा नागरिकांच्या मागासवर्ग (यात यापुढे ज्याचा निर्देश " राखीव प्रवर्ग " असा करण्यात आला आहे) यांच्यासाठी राखून ठेवलेल्या जागेवर खोट्या दाव्याच्या किंवा ती व्यक्ती अशा राखीव प्रवर्गातील आहे असे घोषित करणाऱ्या जातीच्या खोट्या प्रमाणपत्राच्या आधारे, पालिका-सदस्य म्हणून निवडून आली होती असा निर्णय देणारा आदेश, यथास्थिति, कलम १२ किंवा ४४ या अन्वये संबंधित प्राधिकाऱ्याने दिलेला असल्यास अशी व्यक्ती पालिका-सदस्य म्हणून असल्यास किंवा पालिका-सदस्य म्हणून निवडून येण्यासाठी निवडणूक लढविण्यास, सहा वर्षांच्या कालावधीकरिता अनर्ह ठरील.

(ब) संबंधित प्राधिकारी ज्या दिनांकाला असा आदेश संमत करील, त्या दिनांकापासून अनर्हतेचा असा कालावधी सुरू होईल.

(१क) (अ) पोट-कलम (१ब) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, पोट-कलम (१ब) मध्ये निर्देशिलेल्या राखीव जागेवर निवडून आलेला पालिका-सदस्य, जाती प्रमाणपत्रे पडताळणी समिती किंवा राज्य शासनाने जाती प्रमाणपत्राच्या छाननीसाठी विनिर्दिष्ट केलेला एखादा अन्य सक्षम प्राधिकारी यांनी, अशा पालिका-सदस्यांचे जाती प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करून ती व्यक्ती राखीव प्रवर्गाची आहे असा दावा करणाऱ्या अशा व्यक्तीच्या खोट्या दाव्यावर किंवा प्रतिज्ञापत्रावर आधारित असल्याच्या कारणास्तव ते रद्द केल्याचा परिणाम म्हणून तो असा सदस्य म्हणून राहण्यास अनर्ह होईल ; आणि त्यानंतर उक्त समितीने किंवा सक्षम प्राधिकाऱ्याने असे प्रमाणपत्र विधिअग्राह्य असल्याचे घोषित करून ते रद्द केल्याच्या दिनांकास व त्या दिनांकापासून त्या सदस्याने आपले पद रिकामे केले असल्याचे मानण्यात येईल.

(ब) एखादी व्यक्ती पालिका-सदस्य म्हणून असण्यास अनर्ह ठरल्यास आणि परिणामी असा पालिका सदस्य म्हणून असलेले त्याचे पद, खंड (अ) अन्वये रिक्त झाल्यास, राज्य शासन, राजपत्रातील अधिसूचनेद्वारे, अशा व्यक्तीस, अशा आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीकरिता पालिका-सदस्य म्हणून, निवडून येण्यास किंवा पालिका-सदस्य म्हणून असण्यास, अनर्ह ठरवील. ".

४४. नगरपरिषदा अधिनियमाचे कलम ४४, पोट-कलम (१) मध्ये,— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ४४ ची सुधारणा.

(अ) खंड (ड) मध्ये " अनुपस्थित राहिला " या मजकुरानंतर " तर; किंवा " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल ;

(ब) खंड (ड) नंतर पुढील खंड ज्यादा दाखल करण्यात येईल :—

" (ई) त्याने/तिने स्वतः, त्याच्या बायकोने/तिच्या नवऱ्याने किंवा त्याच्या/तिच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्तीने, या अधिनियमाच्या किंवा महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या किंवा उक्त अधिनियमाखाली करण्यात आलेल्या नियमांच्या किंवा उप-विधींच्या तरतुदींचा भंग करून कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत संरचनात्मक बांधकाम केलेले असेल किंवा करीत असेल; किंवा असे बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम करण्यास असा पालिका-सदस्य या नात्याने प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे जबाबदार असेल किंवा या नात्याने त्याने त्याकामी मदत केलेली असेल किंवा कोणतेही बेकायदेशीर किंवा अनधिकृत बांधकाम पाडून टाकण्याचे आपले पदीय कर्तव्य पार पाडणाऱ्या कोणत्याही सक्षम प्राधिकाऱ्याच्या कामात लेखी प्रत देऊन किंवा प्रत्यक्ष जागेवर जाऊन अडथळा आणला असेल किंवा अडथळा आणण्याचा प्रयत्न केलेला असेल. ". १९६६ चा महा. ३७.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ६१ ची सुधारणा.

**४५.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ६१ मध्ये,—

(अ) पोट-कलम (१) मध्ये,—

(एक) " मानधन किंवा " या मजकुराऐवजी, " मानधन आणि " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन), विद्यमान तक्त्याऐवजी पुढील तक्ता दाखल करण्यात येईल :—

| " नगरपालिका क्षेत्राचा वर्ग (१) | दरमहा द्यावयाच्या मानधनाचा कमाल दर. (२) | दरवर्षी द्यावयाच्या आतिथ्य भत्त्याची कमाल रक्कम. (३) |
|---|---|---|
| | रुपये | रुपये |
| अ .. | ३,००० | १५,००० |
| ब .. | २,५०० | १०,००० |
| क .. | २,००० | ७,५००. "; |

(ब) पोट-कलम (२) मध्ये,—

(एक) " ३० रुपये " या मजकुराऐवजी " १०० रुपये " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) " १५० रुपये " या मजकुराऐवजी " ५०० रुपये " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

४६. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ७२ मध्ये,— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ७२ ची सुधारणा

(अ) विद्यमान तक्त्याऐवजी, पुढील तक्ता दाखल करण्यात येईल :—

| " नगरपालिका क्षेत्राचा वर्ग | पुढील समित्यांच्या बाबतीतील वित्तीय मंजुरीच्या मर्यादा | |
|---|---|---|
| | स्थायी समिती | विषय समिती |
| (१) | (२) | (३) |
| | रुपये | रुपये |
| अ .. | ५,००,००० | १,००,००० |
| ब .. | २,५०,००० | ५०,००० |
| क .. | १,००,००० | २५,००० "; |

(ब) परंतुकामध्ये,—

(एक) " ३०,००० रुपयांपेक्षा " या मजकुराऐवजी, " ७५,००० रुपयांपेक्षा " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) " १५,००० रुपयांपेक्षा " या मजकुराऐवजी, " ४०,००० रुपयांपेक्षा " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

४७. नगर परिषदा अधिनियमाच्या कलम ७७-अ मधील, तक्त्याऐवजी पुढील तक्ता दाखल करण्यात येईल :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ७७ अ ची सुधारणा.

| " नगरपालिका क्षेत्राचा वर्ग | दरवर्षी द्यावयाच्या आतिथ्य भत्याची रक्कम |
|---|---|
| (१) | (२) |
| | रुपये |
| अ .. .. | ३,००० |
| ब .. .. | २,००० |
| क .. .. | १,५०० "; |

४८. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ७९ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यांत येईल :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० यामध्ये कलम ७९ अ समाविष्ट करणे.

परिषदेच्या अधिकारी व कर्मचारी यांच्या खटला भरण्याच्या कार्यवाहीस मंजुरी देणे.

" **७९ अ.** कलम ७९ मध्ये किंवा या अधिनियमाच्या इतर कोणत्याही कलमामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, परिषदेच्या ज्या कोणत्याही अधिकाऱ्यांवर किंवा कर्मचाऱ्यांवर खटला भरण्याची मागणी पोलिसांकडून किंवा इतर कोणत्याही शासकीय अभिकरणाकडून करण्यात आली असेल, त्यास मंजुरी देण्यास मुख्य अधिकारी सक्षम असेल. मुख्य अधिकारी, अशा कोणत्याही कार्यवाहीच्या मंजुरीची माहिती परिषदेच्या पुढील सभेमध्ये नगर परिषदेला देईल.".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ८१ ची सुधारणा.

**४९.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ८१ मध्ये, पोट-कलम (१०) नंतर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु, सभेमध्ये, पाचपेक्षा अधिक विषयांवर विचार करण्याकरिता प्राधिकाऱ्यांकडून अशी कोणतीही परवानगी देण्यात येणार नाही. ".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १४७ अ ची सुधारणा.

**५०.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १४७ अ च्या, पोट-कलम (१) मध्ये, " अर्धा टक्का " या मजकुराऐवजी " एक टक्का " हा मजकूर दाखल करण्यात येईल. ".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ३०३ ची सुधारणा.

**५१.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ३०३ मध्ये, " कोणत्याही कृत्यांच्या संबंधात " या मजकुरानंतर " जिल्हाधिकाऱ्याविरूद्ध, संचालकाविरूद्ध, विभागीय संचालकाविरुद्ध किंवा राज्य शासनाच्या अन्य कोणत्याही अधिकाऱ्याविरुद्ध किंवा " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ३४१ अ ची सुधारणा.

**५२.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ३४१ अ मध्ये, पोट-कलम (१) नंतर पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (१अ) पोट-कलम (१) च्या परंतुकामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य शासनाला **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, जिल्हा मुख्यालय किंवा तालुका मुख्यालय असलेले क्षेत्र, संक्रमणात्मक क्षेत्र म्हणून घोषित करता येईल ;

(१ब) पोट-कलम (१) किंवा (१अ) अन्वये अधिसूचना प्रसिद्ध करण्यापूर्वी, कलम ३ च्या पोट-कलम (३), (४) व (५) मध्ये विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीचे योग्य त्या फेरफारांसह, अनुसरण करण्यात येईल. ".

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ८१ ची सुधारणा.

**४९.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ८१ मध्ये, पोट-कलम (१०) नंतर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु, सभेमध्ये, पाचपेक्षा अधिक विषयांवर विचार करण्याकरिता प्राधिकाऱ्यांकडून अशी कोणतीही परवानगी देण्यात येणार नाही. ".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १४७ अ ची सुधारणा.

**५०.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १४७ अ च्या, पोट-कलम (१) मध्ये, " अर्धा टक्का " या मजकुराऐवजी " एक टक्का " हा मजकूर दाखल करण्यात येईल. ".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ३०३ ची सुधारणा.

**५१.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ३०३ मध्ये, " कोणत्याही कृत्यांच्या संबंधात " या मजकुरानंतर " जिल्हाधिकाऱ्याविरुद्ध, संचालकाविरुद्ध, विभागीय संचालकाविरुद्ध किंवा राज्य शासनाच्या अन्य कोणत्याही अधिकाऱ्याविरुद्ध किंवा " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ३४१ अ ची सुधारणा.

**५२.** नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ३४१ अ मध्ये, पोट-कलम (१) नंतर पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" (१अ) पोट-कलम (१) च्या परंतुकामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य शासनाला **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, जिल्हा मुख्यालय किंवा तालुका मुख्यालय असलेले क्षेत्र, संक्रमणात्मक क्षेत्र म्हणून घोषित करता येईल ;

(१ब) पोट-कलम (१) किंवा (१अ) अन्वये अधिसूचना प्रसिद्ध करण्यापूर्वी, कलम ३ च्या पोट-कलम (३), (४) व (५) मध्ये विहित करण्यात आलेल्या कार्यपद्धतीचे योग्य त्या फेरफारांसह, अनुसरण करण्यात येईल. ".

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई